दिनांक ०१.०२.२००९ पूर्वी नक्षलवादी हल्ल्यात मयत झालेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक- पीडब्ल्यूएफ-०४१२/प्र.क्र.२१३/भाग-२/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० ऑगस्ट, २०१७.

**वाचा** :-

१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-०२०९/ प्र.क्र.१०७/पोल-७, दिनांक ०६.०२.२००९.

२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-संकीर्ण-०८०९/ प्र.क्र.६१८/पोल-७, दिनांक ०९.१०.२००९.

३) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक- पीडब्ल्यूएफ-०४१२/प्र.क्र.२१३/भाग-२/पोल-७, दिनांक १९.०९.२०१६.

४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २८-ए/ ४९३७/सा.अ.-व-इ.स.-शहीद/४३ (११)/ २०१७, दिनांक १५.०३.२०१७.

**प्रस्तावना.**

दिनांक ०१.०२.२००९ पूर्वी नक्षलवादी हल्ल्यात मयत झालेले पोलीस अधिकारी व कर्मचारी यांच्या कुटुंबियांना *(दिनांक ०६.०२.२००९ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे)* मोफत सदनिकेऐवजी रु.२२.५० लक्ष ते रु.३० लक्ष इतकी रक्कम प्रदान करण्यास, एक खास बाब म्हणून, शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-०४१२/प्र.क्र.२१३/भाग-२/पोल-७, दिनांक १९.०९.२०१६, द्वारे मंजूरी देण्यात आली होती. त्याच प्रमाणे, भंडारा जिल्ह्यात नक्षलवादी हल्ल्यात (१) दिनांक २०.०४.१९९३ रोजी मयत झालेले दिवंगत योगेश्वर तुकाराम हेडाऊ, पोलीस हवालदार-१८४ आणि (२) दिनांक ०१.०८.१९९५ रोजी मयत झालेले दिवंगत दामोधर वडतकर, पोलीस शिपाई-१५७८, यांच्या कुटुंबियांनाही मोफत सदनिकेऐवजी रु.२२.५० लक्ष इतकी रक्कम प्रदान करण्याचा प्रस्ताव पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांच्या कार्यालयाने दिनांक १५.०३.२०१७ रोजीच्या संदर्भाधीन पत्राद्वारे शासनास सादर केला आहे. हा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

भंडारा जिल्ह्यात नक्षलवादी हल्ल्यात (१) दिनांक २०.०४.१९९३ रोजी मयत झालेले दिवंगत योगेश्वर तुकाराम हेडाऊ, पोलीस हवालदार-१८४ आणि (२) दिनांक ०१.०८.१९९५

रोजी मयत झालेले दिवंगत दामोधर वडतकर, पोलीस शिपाई-१५७८, यांच्या कुटुंबियांना मोफत सदनिकेऐवजी प्रत्येकी रु.२२.५० लक्ष याप्रमाणे एकूण रु.४५ लक्ष (रुपये पंचेचाळीस लक्ष फक्त) इतकी रक्कम प्रदान करण्यास, एक खास बाब म्हणून, याद्वारे, मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त रक्कम संबंधित व्यक्तींना प्रदान करताना शासनाने वेळोवेळी दिलेल्या निदेशांचे अनुपालन करण्यात यावे.

३. उक्त खर्च हा गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) ११३, पोलीस कर्मचारी वर्ग यांचे कल्याण, (००) (००)(०४) कर्तव्य बजावतांना जखमी झालेल्या पोलिसांना आणि मृत पावलेल्या पोलीस कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना अनुदान (२०५५ ०२९३), या लेखाशीर्षाखाली ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टामधून भागविण्यात यावा.

४. उक्त मयत पोलीस कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना, उक्त मयत कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या तारखेपर्यंत वेतन व भत्ते देय असल्यास, त्यामध्ये घरभाडे भत्ता विचारात घेण्यात येऊ नये.

५. उक्त सानुग्रह अनुदान ही एक वेळची मदत असून त्यास पूर्वोदाहरण समजण्यात येऊ नये.

६. उक्त रक्कम कोषागारातून काढून संबंधितांना प्रदान करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांना नियंत्रक अधिकारी आणि पोलीस अधीक्षक, भंडारा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून, याद्वारे, घोषित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, अर्थसं-२०१५/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.०४.२०१७, अन्वये वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८२८१७३२५०४१२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil
Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.08.28 17:22:47 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), वित्त व नियोजन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षल विरोधी अभियान, नागपूर.
९) पोलीस अधीक्षक, भंडारा.

**प्रतः-**

१) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३) अवर सचिव (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवड फाईल, पोल-७.